निरीक्षक (गट-ब) संवर्गात पदोन्नतीनंतर पदस्थापनेमध्ये बदल करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- न्यायाप्र-४०२१/प्र.क्र.३१०/ राउशु-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २३ मार्च, २०२३.

वाचा :- १) शासन आदेश, गृह विभाग, क्र. इएसटी-१७२१/प्र.क्र.१५६/ राउशु-१, दि.१३.१२.२०२१.
२) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे मूळ अर्ज क्र.१०३१/२०२१ प्रकरणी दि.१४.१०.२०२२ चे आदेश.

**शासन आदेश-**

शासन आदेश, दि.१३.१२.२०२१ अन्वये सन २०२०-२१ या निवडसूचीमधून श्री.कैलास आत्माराम तरे, दुय्यम निरीक्षक, राउशु यांना निरीक्षक पदी पदोन्नती दिली असून, पदोन्नतीनंतर त्यांना नागपूर महसूल विभाग वाटप करुन निरीक्षक, राउशु, वर्धा येथे पदस्थापना केली आहे. श्री.तरे यांनी त्यांना वाटप करण्यात आलेल्या नागपूर महसूल विभागाऐवजी कोकण-२ महसूल विभाग वाटप करण्याबाबत मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र.१०३१/२०२१ दाखल केला होता. सदर प्रकरणी मा.न्यायाधिकरणाने दि.१४.१०.२०२२ रोजीच्या आदेशान्वये, दि.१३.१२.२०२१ च्या शासन आदेशातील श्री.तरे यांना नागपूर महसूल विभागात वर्धा येथे पदोन्नतीनंतर पदस्थापनेचे आदेश रद्द करुन, त्यांना कोकण-२ महसूली विभागात पदस्थापना देण्याचे आदेश दिले आहेत.

२. मा.न्यायाधिकरणाच्या आदेशाच्या अनुषंगाने सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, श्री.कैलास आत्माराम तरे यांची निरीक्षक पदी पदोन्नतीनंतर कोकण-२ संवर्गात पुढीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | निरीक्षकाचे नाव | दि.१३.१२.२०२१ च्या आदेशानुसार वाटप महसूली विभाग व पदस्थापना | मा.न्यायाधिकरणाच्या आदेशानुसार वाटप महसूली विभाग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.कैलास आत्माराम तरे | नागपूर<br>निरीक्षक, राउशु, वर्धा | कोकण-२ | निरीक्षक, भरारी पथक, मुंबई शहर-१ (श्री.जगदाळे यांच्या पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या पदी) |

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२३१७३०३४९५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP
GORAKHNATH
DHAKANE

Digitally signed by SANDEEP GORAKHNATH DHAKANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d08
4d8890fc37c8f673, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E7B44D71EACB46FA051532FB66A73DA715F67803
3161C1162FA83F6713D03552, cn=SANDEEP GORAKHNATH DHAKANE
Date: 2023.03.23 17:34:52 +05'30'

**( संदिप ढाकणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई व नागपूर.
३) सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क.
४) संबंधित अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७) संबंधित निरीक्षक (आयुक्त, राउशु यांचेमार्फत)
८) कार्यासन अधिकारी, राउशु-२ व ३, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.